राज्य पुरस्कृत आय.ई.सी. कार्यक्रम सन २०२१-२२ करीता उपक्रमांसाठी अनुदान खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय, क्रमांकः आयईसी २०२२/प्र.क्र.२/आरोग्य-३**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,

लोकमान्य टिळक रुग्णालय, मुंबई - ४०० ००१.

दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२२

वाचा :

१) उपसंचालक, आरोग्य सेवा राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग,पुणे यांचे पत्र क्रमांक-उसंआसे/राअशिवसंवि/नियोजन/१११४९-५३/२०२१,दिनांक ०७.१२.२०२१.

**शासन निर्णय:**

राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभागातर्फे राष्ट्रीय किटकजन्य आजार नियंत्रण अंतर्गत मागणीनुसार डेंगी/चिकनगुन्या, हिवताप आजार, असांसर्गिक रोग नियंत्रण कार्यक्रम, प्रजनन बाल आरोग्य कार्यक्रम, इ.राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रम व आरोग्य विषयक योजनांचे प्रसिध्दी, राज्यस्तरावरुन कार्यक्षेत्रात वेळोवेळी आयोजित केल्या जाणा-या विविध प्रदर्शनांसाठी आवश्यक असणारे विविध आरोग्य संदेशांचे प्रदर्शन संच व प्रतिकृती मॉडेल्स तयार करणे इ. विविध योजनांच्या जनजागृतीसाठी सन २०२१-२२ या वर्षात घ्यावयाच्या उपक्रमांस आणि त्यासाठी करावयाच्या एकलस्त्रोत खरेदीस या आर्थिक वर्षाच्या रु.१.६५ कोटी ( अक्षरी रुपये एक कोटी पासष्ट लाख ) इतक्या निधीच्या उपलब्धतेनुसार खालीलप्रमाणे अनुदान खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

अ) आयईसी ब्युरो, पुणे मार्फत (प्रशिक्षण व आंतर व्यक्ती संवाद अंतर्गत )राबवावयाचे उपक्रम

| अ. क्र. | उपक्रम | तपशील | अपेक्षित खर्च (रु. लाखात) | अवलंबविण्यात येणारी कार्यपध्दती |
|---|---|---|---|---|
| १ | आय.ई.सी. ब्युरो येथे आय.ई.सी. / बासीसी / एसबीसीसी गॅलरी तयार करणे व प्रशिक्षण सुविधा अद्ययावत करणे. | आय.ई.सी. ब्युरो येथे नवीन होर्डिंग्ज साईन बोर्ड बनविणे, मॉडेल व डिजीटल पध्दतीने आयईसी गॅलरी तयार करणे. प्रशिक्षण कक्षाच्या भोजन कक्ष व फर्निचर व्यवस्था अद्ययावत व आधुनिकीकरण करणे व परिसर आरोग्यदायी करणे. | ४०.०० | अंदाजपत्रकानुसार बांधकाम विभागामार्फत कार्यवाही करण्यात येईल. |
| २ | रंगीत आरोग्य पत्रिका छपाई करुन घेणे डिजीटल आरोग्य पत्रिका व प्रलंबित वृत्तपत्र व जाहीरात देयके अदा करणे. | राज्यभरात प्रसिध्द करण्यात येणा-या आरोग्य पत्रिका ४ रंगात आधूनिक पध्दतीने छपाई करुन घेणे डिजीटल आरोग्य पत्रिका ऑनलाईन समाज माध्यमाद्वारे व्यापकपणे वितरण करणे, प्रलंबित वृत्तपत्र व जाहीरात देयके अदा करणे. | २६.०० | राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग मार्फत कार्यवाही करण्यात येईल. टेंडर वर उपलब्ध असलेल्या संस्थेकडून छापून घेण्यात येईल. |
| | **एकुण अ** | | ६६.०० | |

ब) मा .माहिती व जनसंपर्क विभागा मार्फत( मिडीया प्लॅन अंतर्गत ) चे राबविण्यात येणारे उपक्रम

| अ. क्र. | उपक्रम | तपशील | अपेक्षित खर्च (रु. लाखात) | अवलंबविण्यात येणारी कार्यपध्दती |
|---|---|---|---|---|
| १ | शासनाच्या विविध आरोग्य कार्यक्रमांची जनजागृती करण्यासाठी जिल्ह्यांना कार्पोरेट पुल अप स्टँडी पूरविणे. | राज्यामधील ३४ जिल्ह्यात जिल्हा व तालुका स्तरावरील जिल्हा आरोग्य अधिकारी/ ग्रा.रु./ प्रा.आ.के. येथे वेगवेगळ्या कार्यक्रमाचे संदेश असलेले कार्पोरेट पुल अप स्टँडी पूरविणे. | १०.०० | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांच्या मार्फत शासनाच्या यादीवरील संस्था मार्फत कार्यवाही करण्यात येईल |
| २ | महत्वाचे टेलीफोन नंबर्सची जनजागृती करण्यासाठी जिल्ह्यांना फ्लेक्स बोर्ड मेटल फ्रेमसह पूरविणे. | राज्यामधील ३४ जिल्ह्यात जिल्हा व तालुका स्तरावरील जिल्हा आरोग्य अधिकारी/ ग्रा.रु./ प्रा. आ. के. येथे महत्वाचे टेलीफोन नंबर्स असलेले फ्लेक्स बोर्ड मेटल फ्रेमसह पूरविणे. | १०.०० | =”= |
| ३ | शासनाच्या विविध आरोग्य कार्यक्रमांची जनजागृती करण्यासाठी जिल्ह्यांना Sun Board/ ACP Board वर Vinyl Printing Mounting पूरविणे. | राज्यामधील ३४ जिल्ह्यात जिल्हा व तालुका स्तरावरील जिल्हा आरोग्य अधिकारी/ ग्रा.रु./ प्रा.आ.के. येथे वेगवेगळ्या कार्यक्रमाचे संदेश असलेले Sun Board/ ACP Board वर Vinyl Printing Mounting | १९.०० | =”= |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | पूरविणे. | | |
| ४ | शासनाच्या विविध आरोग्य कार्यक्रमांची जनजागृती करण्यासाठी जिल्ह्यांना Digital Wall Painting करणे. | राज्यामधील ३४ जिल्ह्यात जिल्हा व तालुका स्तरावरील जिल्हा आरोग्य अधिकारी/ग्रा.रु./ प्रा.आ.के. येथे वेगवेगळ्या कार्यक्रमाचे संदेश असलेले Digital Wall Painting करुन घेणे. | ६०.०० | =”= |
| | **एकूण (ब)** | | ९९.०० | |
| | **एकूण (अ+ब)** | | **१६५.००** | |

२. सदर उपक्रमास महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई यांनी दि.०३.१२.२०२१ च्या माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजावणी समितीने मान्यता देण्यात आली आहे.

३. सदर खर्च मागणी क्रमांक- आर-१, मुख्यलेखाशिर्ष "२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ११३- सार्वजनिक आरोग्य विषयक प्रसिध्दी, (०१)(०२) आरोग्य विषय प्रसिध्दी केंद्र (२२१० १०४४), २६- जाहिरात व प्रसिध्दी " याखाली सन २०२१-२२ यावर्षी उपलब्ध असलेल्या निधीमधून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर निधी खर्च करतांना शासन निर्णय, उद्योग,उर्जा व कामगार विभाग, दि.०१.१२.२०१६ “शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका” यात नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार करावा. तसेच यासंदर्भात पुढील कार्यवाही उपसंचालक, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे यांनी करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१११३३३२०४३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2022.02.15 13:53:31 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई / पुणे
४. उप संचालक, आरोग्य सेवा, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).